“पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई” या पदावरील पदस्थापनेबाबत.

# महाराष्ट्र शासन
# गृह विभाग

**शासन आदेश क्र.एच.डी.-१००१०/१९/२०२५-पोल-१**

दुसरा मजला, मंत्रालय (मुख्य इमारत),
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई -४०० ०३२.
दिनांक : ३०.०४.२०२५.

**शासन आदेश.**

शासन अधिसूचना, कार्मिक, लोकगाऱ्हाणी तथा निवृत्तीवेतन मंत्रालय, कार्मिक व प्रशिक्षण विभाग, दिनांक ३१.०७.२०२४ अनुसार “पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई” हे पद “अपर पोलीस महासंचालक” श्रेणीतील संवर्ग पद (Cadre post) आहे.

२. श्री.विवेक फणसळकर, भा.पो.से., पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई हे दि.३०.०४.२०२५ (म.नं.) रोजी नियत वयमानानुसार सेवानिवृत्त होत आहेत.

३. महाराष्ट्र पोलीस अधिनियम (१९५१ चा २२) याच्या कलम २२न मधील तरतुदींनुसार, पुढील तक्त्यातील स्तंभ (२) मध्ये नमूद भा.पो.से अधिकारी यांची, स्तंभ (३) मध्ये निर्दिष्ट पदावरुन, स्तंभ (४) मध्ये नमूद पदावर, याद्वारे, बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे,-

| अ.क्र. (१) | भा.पो.से. अधिका-याचे नाव (२) | विद्यमान पदस्थापना (३) | बदलीने पदस्थापना (४) |
|---|---|---|---|
| १. | श्री. देवेन भारती | विशेष पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई | पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई [ *दि.३०.०४.२०२५ (म.नं.) रोजी रिक्त होणाऱ्या पदी* ] |

४. उक्त शासन आदेश, महाराष्ट्र पोलीस अधिनियम (१९५१ चा २२) याच्या कलम २२न (२) मधील परंतुकानुसार, सर्वोच्च सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४३०११२७३०४१२९ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VENKATESH MADHAV BHAT

Digitally signed by VENKATESH MADHAV BHAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=5f0272b97156a5d2812bad6725ca46fb2671d1da08208cfdd6677fac0afd6bf2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6E277C9088A4CB8B53E535A4642A6800B908C5DBDB3A63175760874EBA717AE1, cn=VENKATESH MADHAV BHAT
Date: 2025.04.30 11:30:52 +05'30'

( व्यंकटेश भट )
**शासनाचे सह सचिव.**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव/प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.

४) मा. राज्यमंत्री, गृह (शहरे/ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत,**

श्री. देवेन भारती, भा.पो.से.(पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांचेमार्फत)

**प्रत,**

१) प्रधान महालेखापाल (लेखा व हकदारी/लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
२) अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव (अपील व सुरक्षा) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव (विशेष) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७) सहायक संचालक, भा.पो.से. कक्ष, मंत्रालय, मुंबई.
८) निवड नस्ती, पोल-१.